केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत NRLM करिता आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१६-१७ अंतर्गत महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला अर्थसहाय्य या योजनेस (केंद्र हिस्सा) लेखाशिर्ष २५०१ २९६२ व राज्य हिस्सा लेखाशिर्ष क्र. २५०१ २७९३ खाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६/प्र.क्र.२३ /कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ०८ मार्च, २०१७.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) केंद्र शासन पत्र क्रमांक J-12025/01/2016-RL(NRLM_37C ), दिनांक ०३-०२-२०१६.
४) ग्रामविकास व जलसंधारण विभागाची नस्ती क्र.मजीअ- २०१६/ प्र.क्र.८४/यो- ३.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २५०१ विशेष ग्रामविकास कार्यक्रम, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना, ०१, एकात्मिकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला अर्थसहाय्य ( केंद्र हिस्सा), ( २५०१ २९६२ ), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु.११८२.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

त्याचप्रमाणे राज्य हिस्सा म्हणून टी-५, २५०१ विशेष ग्रामविकास कार्यक्रम, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना, ०१, एकात्मिकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०१) जिल्हा ग्रामीण विकास अभिकरणाकडून अर्थसहाय्य (राज्य हिस्सा), ( २५०१ २७९३ ), ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु. ७८८.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत NRLM करिता TSP प्रवर्गासाठी वाचा क्र.३ नुसार रु. ३१८.६१ लक्ष तरतूद वितरित केली असल्याने **लेखाशिर्ष २५०१ २९६२, ३३ - अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात अर्थसंकल्पित रु.११८२.०० लाख निधीपैकी वितरीत करावयाच्या शिल्लक रक्कम रु.२३६.१३ लक्ष (रुपये दोन कोटी छत्तीस लाख तेरा हजार फक्त) आणि त्यास समरुप ४० % लेखाशिर्ष २५०१ २७९३, ३१ -सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली रु. १५७.४२ लाख ( रुपये एक कोटी सत्तावन्न लाख बेचाळीस हजार फक्त ) आणि** मागील वितरणामधील **उर्वरित रु. ०.१८ लाख (**रुपये अठरा हजार फक्त) इतका निधी या योजनेचे नियंत्रक अधिकारी प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-

२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. **आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी**. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, ग्रामविकास व जलसंधारण विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्र शासनाला कळविता येईल.

६. नियंत्रण अधिका-यांनी वित्त विभागाच्या दि.२०-०४-२०१६ व दि. १०-०५-२०१६ रोजीच्या परिपत्रकातील अटी व शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घ्यावी.

७. सदर शासनादेश **वाचा** येथील क्रमांक २ मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६. अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७२/अर्थोपाय, दि.१३-०२-२०१७ अन्वये दिलेल्या मंजूरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०८१३१४३०७६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.08 14:13:10 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

०९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, जल-०३, मंत्रालय, मुंबई.

११. कार्यासन अधिकारी, कार्यासन- २ / कार्यासन-१७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.